**सास्तुर, ता. लोहारा, जि. उस्मानाबाद येथील प्राईड इंडिया संस्थेच्या स्पर्श रूग्णालयास सन २०१५-१६ या वर्षीचे अनुदान मंजुर करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

## शासन निर्णय क्रमांकः प्राईड-२०१७/ प्र.क्र.०७/ आरोग्य-४

मंत्रालय, १० वा मजला, कॉम्पलेक्स बिल्डींग,
गोकूळदास तेजपाल रूग्णालय आवार, मुंबई.
तारीख: २९ मार्च, २०१७.

**वाचा**

1) **शासन निर्णय, सा.आ.वि., क्रमांकः आरएलएच-२७९६/१४५२/प्र.क्र.२४६/ आरोग्य-४, दि.२६.०६.२०००.**
2) **शासन निर्णय, सा.आ.वि., क्रमांकः प्राईड-२०१०/ प्र.क्र.९९/ आरोग्य-४, दि.२३.०९.२०१२.**
3) **सहसंचालक, आरोग्य सेवा, रूग्णालये ( राज्यस्तर ), मुंबई यांचे पत्र, क्रमांकः संआसे /राज्यस्तर/ टे-२/कक्ष-३/ग्रा.रु.सास्तूर/५८३-८४/१७, दि.१०.०१.२०१७.**

**प्रस्तावना**

सन १९९३ या वर्षी सास्तुर, जि.उस्मानाबाद येथे झालेल्या भुकंपाच्या पार्श्वभुमीवर तेथील नागरिकांना आरोग्य सेवा/सुविधा मिळण्याच्या उद्देशाने प्राईड इंडिया या संस्थेने स्पर्श रूग्णालयाची स्थापना केलेली आहे. सदर रूग्णालयास शासनातर्फे आर्थिक मदत देण्यासाठी शासनाने विहित अटी व शर्तीसह संस्थेसाबत करारनामा करून दिनांक २६.०६.२००० च्या शासन निर्णयान्वये सदर संस्थेस अनुदान देण्याबाबत मान्यता देण्यात आली होती. तदनंतर सहाव्या वेतन आयोगानुसार संस्थेस द्यावयाच्या अनुदानात वाढ करून, काही अटींमध्ये बदल करून व काही अटींचा समोवश करून नव्याने सामजस्य करारास संदर्भाधीन क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. यानुसार ग्रामीण रूग्णालयाकरीता येणाऱ्या खर्चाइतके अनुदान (रू. ५३.०४ लक्ष ) किंवा संस्थेने कर्मचाऱ्यांचे वेतन व भत्ते आणि औषधे (रू. ४ लाख) व आकस्मिकता खर्च (रू. २ लाख ) यापैकी जी रक्कम कमी असेल त्याप्रमाणात अनुदान संस्थेस देण्यास मान्यता देण्यात आली आहे. या शासन निर्णयाच्या परिशिष्ट “अ” मधील अट क्र. ११ मध्ये नमुद केल्यानुसार सहाय्यक संचालक, उपसंचालक आरोग्य सेवा, लातूर यांचे कार्यालय यांनी दिनांक २४.११.२०१६ रोजी या रूग्णालयाची भेट देऊन तपासणी केलेली आहे. सदर तपासणी अहवाल व उपसंचालक, आरोग्य सेवा मंडळ, लातूर यांच्या शिफारसीनुसार सहसंचालकांकडून या रूग्णालयासाठी सन २०१५-१६ या वर्षातील अनुदान रूपये ५३.०४ लक्ष मंजुर करण्याबाबतचा प्रस्ताव शासनास प्राप्त झाला आहे. या अनुषंगाने व सदर संस्था सामंजस्य करारानुसार पुर्तता करीत असल्याने अनुदानाच्या प्रस्तावास मंजुरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

सास्तूर, ता.लोहारा, जि. उस्मानाबाद येथील प्राईड इंडिया संस्थेच्या स्पर्श रूग्णालयाची सहाय्यक संचालक, उपसंचालक आरोग्य सेवा, लातूर यांचे कार्यालय यांनी तपासणी केलेली आहे. त्यांनी दिलेल्या अहवालानुसार सदर संस्था संदर्भाधीन क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये विहित केलेल्या परिशिष्ट "अ" मधील अटींची पुर्तता करीत असल्याने सन २०१५-१६ या वर्षामध्ये संस्थेने केलेल्या खर्चाकरीता अनुज्ञेय रूपये ५३.०४ लक्ष ( अक्षरी रूपये त्रेपन्न लक्ष चार हजार फक्त ) इतके अनुदान संस्थेस मंजूर करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

प्रस्तुत प्रयोजनार्थ होणारा खर्च खालील लेखाशीर्षांतर्गत सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाकरीता मंजुर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**मागणी क्र. आर-१**

"२२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
०१- नागरी आरोग्य सेवा- विषम चिकित्सा ग्रामीण आरोग्य सेवा
११०- रूग्णालये व दवाखाने
११०(४)- मुफसल रूग्णालये व दवाखाने यांना सहाय्यक अनुदान
(०३) (०१)- अध्यापनेतर रूग्णालये व दवाखने यांना सहाय्यक अनुदान ( २२१० ०१७३ )
३१- सहाय्यक अनुदाने "

प्रस्तुत तरतूद उपसंचालक, आरोग्य सेवा, लातूर मंडळ, लातूर यांच्या अधिनस्त ठेवण्याबाबतची कार्यवाही सहसंचालक, आरोग्य सेवा ( अर्थसंकल्प व प्रशासन ), पुणे यांनी करावी.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय, क्र. विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/ २०१३/ विनियम,भाग-२, दि.१७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील भाग-पहिला, उपविभाग-एक मधील अनुक्रमांक २७ येथील नियम क्र.१४९ अन्वये संस्थांना आवर्ती सहाय्यक अनुदान मंजुर करण्याबाबत प्रशासनिक विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३२७१२४३२४९८१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vivek Rambhaji Dahiphale
Digitally signed by Vivek Rambhaji Dahiphale
DN: CN = Vivek Rambhaji Dahiphale, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Dept
Date: 2017.03.29 20:17:21 +05'30'

**विवेक दहिफळे**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल,१/२ महाराष्ट्र( लेखा व लेखापरिक्षा )/ ( लेखा व अनुज्ञेयता ), मुंबई/ नागपूर.

२. संचालक, आरोग्य सेवा, महाराष्ट्र राज्य, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
३. अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा ( कुटूंब कल्याण, माता बालसंगोपन व शालेय आरोग्य),पुणे.
४. सहसंचालक, आरोग्य सेवा, रूग्णालये (राज्यस्तर), मुंबई.
५. सहाय्यक संचालक ( लेखा व लेखापरिक्षा ), आरोग्य सेवा, पुणे.
६. सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन ), पुणे.
७. उपसंचालक, आरोग्य सेवा, लातूर मंडळ, लातूर.
८. जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रूग्णालय, उस्मानाबाद.
९. जिल्हा कोषागार अधिकारी, लातूर.
१०. प्रकल्प अधिकारी, प्राईड इंडिया स्पर्श ग्रामीण रूग्णालय, सास्तुर,ता.लोहारा, जि.उस्मानाबाद.
११. वित्त विभाग (विनियम कार्यासन ), मंत्रालय, मुंबई.
१२. अवर सचिव (अर्थसंकल्प), सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई.
१३. निवडनस्ती( आरोग्य-४ ), सा.आ.वि.